राज्यात करोना विषाणू (कोव्हिड १९) चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी प्रतिबंधात्मक उपाययोजना करण्यास्तव तातडीच्या खरेदीसाठी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी व राज्यस्तरावर आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय तसेच संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचे अध्यक्षतेखाली समिती स्थापन करणेबाबत

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
**क्र. करोना-२०२०/प्र क्र ५८/ आरोग्य ५ दिनांक १६ एप्रिल २०२०.**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय कंपाऊंड, कॉम्प्लेक्स बिल्डिंगवा मजला १० ,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

**प्रस्तावना :-**

सध्या जगभरात कोरोना समुहातील कोविड -१९ या विषाणूचा प्रादुर्भाव मोठया प्रमाणावर झालेला आहे. सद्य:स्थितीत देशात तसेच, राज्यातही या विषाणूचा वाढता प्रादुर्भाव दिसून येत असल्याने या रोगाचा संसर्ग आटोक्यात आणण्याच्या दृष्टीने राज्यात तातडीने उपाययोजना करणे आवश्यक ठरले. त्यानूसार सार्वजनिक आरोग्य विभागाकडून केलेल्या विविध उपाययोजना व त्याअनुषंगाने निर्गमित करण्यात आलेल्या अधिसूचना व आदेश दि.०७ एप्रिल,२०२० रोजी मंत्रीमंडळाच्या निदर्शनास आणण्यात आल्या.

तसेच तातडीची खरेदी करण्यासाठी राज्याच्या खरेदी धोरणानुसार निविदा प्रक्रिया राबविण्यास लागणारा कालावधी लक्षात आपत्कालीन आरोग्य विषयक परिस्थिती लक्षात घेऊन जिल्हा व राज्यस्तराव खरेदी करण्याबाबत खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाने मान्यता दिली आहे.

**शासन निर्णय :**

१. राज्याचे खरेदी धोरण निश्चित करण्यात आलेले आहेत. तथापि सद्य:स्थितीत आरोग्य विषयक आपतकालीन परिस्थिती उद्भवल्याने निविदा प्रक्रिया राबवून दर निश्चित करणे इत्यादी बाबीसाठी बराच कालाव्याप होण्याची शक्यता लक्षात घेऊन आपतकालीन परिस्थितीत साथरोग कायदा १८९७ व राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन कायदा २००५ अमंलात असे पर्यंत जिल्हास्तरावरील खरेदीसाठी जिल्हाधिकारी यांचेस्तरावर समिती गठीत करुन या समितीला खालील अटींवर खरेदी करण्याची मुभा देण्यात आली आहे.

२. सदर खरेदी ही जिल्हास्तरावर उपलब्ध राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत उपलब्ध निधी, जिल्हा वार्षिक योजनांतर्गत निधी, राष्ट्रीय आपत्ती निवारण कक्षाकडून प्राप्त झालेला निधी तसेच वैद्यकीय शिक्षण विभागाला राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन कक्ष, महात्मा ज्योतिबा फुले अंतर्गत व वैद्यकीय शिक्षण विभागाच्या कडून प्राप्त अनुदान इत्यादीद्वारे उपलब्ध झालेल्या अनुदानातून करण्यास अनुमती देण्यात आली आहे.

३. सदर खरेदी ही जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील गठीत झालेल्या समितीच्या मान्यतेने व शिफारशीनुसार हाफकीन अंतर्गत खरेदी कक्ष, बृहनमुंबई महानगरपालिका, केंद्र शासन उपक्रम - एच. एल. एल. लाईफ केअर तसेच अन्य शासन उपक्रम के. ए. पी. एल. लाईफ केअर, तसेच अन्य राज्यशासनाच्या मेडीकल सर्व्हीस कार्पोरेशनचे दरसूचीनूसार करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

४. वैद्यकीय उपकरणे व यंत्रसामग्रीची आवश्यकता व त्याची तांत्रिक विर्निदेश (टेक्नीकल स्पेसिफीकेशन) हे समितीत असलेल्या आरोग्यसेवा संचालनालयाच्या व वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या सदस्यांनी शिफारस करणे किंवा ज्या तांत्रिक विर्निदेशांना मान्यता आहे (Already approved) अशीच उपकरणे ही या समितीच्या मान्यतेने खरेदी करता येतील. तसेच औषधे उपकरणे व यंत्रसामुग्री कोव्हीड १९ प्रादुर्भावामुळे उदभवलेल्या आजारावर उपचारासाठी आवश्यक असल्याचे या समितीने प्रमाणित करणे आवश्यक आहे.

५. व्हेंटीलेटर खरेदीची जिल्हानिहाय संख्या मा.मुख्यसचिवांकडून संमत करुन घेणे आवश्यक आहे. आपत्कालीन परिस्थितीत व राज्य शासनाच्या निर्देशानूसार सदर व्हेंटिलेटर्स आवश्यकतेनूसार इतरत्र वापरण्यात येतील.

६. **आपत्कालीन परिस्थितीत राज्य स्तरावर औषध व यंत्रसामुग्रीची खरेदी करण्याची आवश्यकता भासल्यास उपरोक्त अटी व शर्तीनूसार साथरोग कायदा १८९७ तसेच आपत्ती निवारण कायदा २००५ लागू असे पर्यंत आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान तसेच संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांच्या स्तरावर समिती गठीत करुन त्यांना खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, आरोग्य सेवा व संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांनी समिती गठनाच्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करावी.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(डॉ. प्रदीप व्यास)
प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग

प्रति,

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
२. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, महानगरपालीका (सर्व)
४. सर्व विभागीय आयुक्त
५. महालेखापाल, मुंबई / नागपूर
६. सर्व जिल्हाधिकारी
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
९. आयुक्त, अन्न व औषध प्रशासन, मुंबई
१०. संचालक, वैद्यकिय शिक्षण संचालनालय, मुंबई
११. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई / पुणे
१२. अतिरिक्त संचालक (सर्व) आरोग्य सेवा ,
१३. सहसंचालक (सर्व) आरोग्य सेवा ,
१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / नागपूर

१५. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१६. उपसंचालक (सर्व) आरोग्य सेवा ,

१७. जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)

१८. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)

प्रत माहितीस्तव

२१. मा मुख्यमंत्री यांचे .प्रधान सचिव

२२. मा .उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

२३. मा. मंत्री, (सार्वजनिक आरोग्य ) यांचे खाजगी सचिव

२४. मा. राज्यमंत्री, (सार्वजनिक आरोग्य ) यांचे खाजगी सचिव

२५. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव

२६. सर्व सह सचिव / उप सचिव /अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई

27. निवड नस्ती-आरोग्य ५